


महाराष्ट्र शासन

# भौतिकशास्त्र परिभाषा कोश

भाषा संचालनालय, महाराष्ट्र शासन

## भाषा सल्लागार मंडळ

### अध्यक्ष

डॉ. वि. भि. कोलते

### सदस्य

प्रा. गं. बा. सरदार

डॉ. ग. मो. पाटील

प्रा. भगवंत देशमुख

श्री. देवीसिंग व्यं. चौहान

श्री. त्रि. गो. देशमुख

प्रा. अरविंद मंगरूळकर

श्री. पी. बी. साळुंखे

प्रा. कृ. श्री. अर्जुनवाडकर

### सदस्य-सचिव

श्री. य. शं. कानिटकर, भाषा संचालक व शासनाचे पदसिद्ध उपसचिव

## भौतिकशास्त्र उपसमिति

### अध्यक्ष

श्री. गो. रा. परांजपे, मराठी विज्ञान परिषद

### प्रतिनिधि-सदस्य

डॉ. एम. आर. भिडे, पुणे विद्यापीठ

डॉ. सी. एस. कर्वे, मुंबई विद्यापीठ

डॉ. पी. एल. खरे, नागपूर विद्यापीठ

प्रा. मार्तंडराव शेलगावकर, मराठवाडा विद्यापीठ

प्रा. सी. एच. सावे, शिवाजी विद्यापीठ

श्रीमती मृणालिनी करमरकर, श्रीमती ना. दा. ठा. महिला विद्यापीठ

प्रस्तुत कोश मुद्रणाच्या अंतिम अवस्थेत असताना भौतिकशास्त्र परिभाषा उपसमितीचे अध्यक्ष श्री. गो. रा. परांजपे यांचे पुणे येथे शोचनीय निधन झाले. या कोशाच्या छपाईबद्दल ते वेळोवेळी आस्थापूर्वक विचारणा करीत असत. हा कोश मुद्रित स्वरूपात पाहण्यासाठी ते आमच्यात नाहीत याबद्दल अतीव दुःख वाटते.

# प्र स्ता व ना

महाराष्ट्र राज्याच्या निर्मितीनंतर मराठी भाषेला राजभाषेचे स्थान मिळाले. साहजिकच महाराष्ट्रातील सर्व विद्यापीठांतील शिक्षणाचे माध्यम मराठी असावे हेही सर्वमान्य झाले. शिक्षणक्षेत्रातील माध्यमाचे हे परिवर्तन कार्यक्षमतेने घडवून आणण्यात मुख्यत्वेकरून दोन अडचणी होत्या.

पहिली अडचण म्हणजे शासकीय कामकाजासाठी व तांत्रिक विद्याशाखांसाठी आवश्यक असलेला पारिभाषिक शब्दसंग्रह हाताशी नव्हता. दुसरे असे की, निरनिराळ्या विद्याशाखांतील विषय शिकवण्याकरिता आवश्यक असलेली पाठ्यपुस्तके व संदर्भ पुस्तके लिहिली गेली नव्हती. काही विद्यापीठांनी या दृष्टीने प्रयत्न केले होते, परंतु ते त्यांच्यापुरते व मर्यादित स्वरूपात होते. सर्व विद्यापीठांतून समान आणि एकरूप परिभाषा वापरली जावी यासाठी शासनाने पुढाकार घेणे आवश्यक होते.

या सर्व गोष्टींचा सांगोपांग विचार करण्यासाठी महाराष्ट्रातील सर्व विद्यापीठांचे कुलगुरू व भाषा सल्लागार मंडळाचे सदस्य यांची एक संयुक्त बैठक शासनातर्फे आयोजित करण्यात आली. या बैठकीत, भाषा संचालनालयाने विद्यापीठांतून शिकवल्या जाणाऱ्या सर्व विज्ञानविषयक व मानवविद्याविषयक विषयांची परिभाषा सर्व विद्यापीठांच्या सहकार्याने तयार करावी असे ठरले. संदर्भ ग्रंथांच्या व क्रमिक पुस्तकांच्या निर्मितीचे काम महाराष्ट्र राज्य पाठ्यपुस्तक निर्मिती मंडळ आणि महाराष्ट्र राज्य विद्यापीठ ग्रंथ निर्मिती मंडळ या संस्थांनी हाती घेतले.

वरील निर्णयाच्या अनुरोधाने भाषा संचालनालयाने शास्त्रीय व मानविकी विद्याशाखांतील भौतिक, रसायन, गणित, अभियांत्रिकी यांसारख्या काही मूलभूत विषयांच्या उपसमित्या प्रथम स्थापन करून व काही निदेशक तत्त्वे ठरवून या कामाला सुरुवात केली. या उपसमित्यांवर सर्व विद्यापीठांचे प्रतिनिधी व विज्ञान परिषद इत्यादींसारख्या संस्थांचे प्रतिनिधी, सदस्य म्हणून नेमण्यात आले. परिभाषानिर्मितीचे काम, अशा तऱ्हेचा हा पहिलाच प्रयत्न असल्याने, अत्यंत कठीण होते. शिवाय, ही परिभाषा केवळ प्रादेशिक स्तरापुरतीच मर्यादित न राहता, अन्य भारतीय भाषांनाही ती स्वीकार्य होऊन अखिल भारतीय स्तरापर्यंत तिचा वापर होईल, हा दृष्टिकोन ठेवणेही आवश्यक होते. त्यामुळे ही परिभाषा केंद्र सरकारने तयार केलेल्या परिभाषेशी, मराठी भाषेच्या प्रकृतीला बाधा येणार नाही अशा प्रकारे, मिळतीजुळती असावी असे धोरणही ठरविण्यात आले. या शब्दनिर्मितीकरिता मराठी भाषेत तोपर्यंत तयार झालेल्या इतर शास्त्रीय विषयांवरील शब्दकोशांचाही उपयोग करण्यात आला. ज्या ठिकाणी पर्यायांबाबत अडचण निर्माण झाली त्या ठिकाणी संस्कृत भाषेचा आधार घेणे अपरिहार्य ठरले.

आतापर्यंत भाषा संचालनालयाने, गणित, रसायन, समाजशास्त्र, वाणिज्य, तत्त्वज्ञान व तर्कशास्त्र, ग्रंथालय, शारीर, भूशास्त्र, शिक्षण, यंत्र अभियांत्रिकी या विषयांवरील परिभाषा कोश प्रसिद्ध केले आहेत. तसेच, विद्युत अभियांत्रिकी, स्थापत्य अभियांत्रिकी,

जीवशास्त्र हे परिभाषा कोश मुद्रणाच्या अंतिम अवस्थेत असून, ते लवकरच प्रसिद्ध होतील. कृषि, अर्थशास्त्र, राज्यशास्त्र, धातुशास्त्र, भूगोल; शरीरक्रिया, भाषाशास्त्र व साहित्यसमीक्षा या विषयांचे परिभाषानिर्मितीचे काम पूर्ण झाले असून, त्यांची मुद्रणप्रत तयार करण्याचे काम चालू आहे. त्याचप्रमाणे, मानसशास्त्र, व्यवसाय-व्यवस्थापन, विकृतिशास्त्र, सांख्यिकी, लोकप्रशासन या नवीन विषयांच्या परिभाषा-निर्मितीचे काम चालू आहे. गणित, रसायन या कोशांची सुधारित आवृत्ती तयार करण्याचे कामही चालू आहे. प्रस्तुत कोशाची चक्रमुद्रित प्रत यापूर्वीच तयार करण्यात आली होती व संबंधित तज्ञांच्या अभिप्रायासाठी पाठवण्यात आली होती. या प्रतीवर आलेल्या अभिप्रायांचा विचार करून प्रस्तुत कोश आता प्रसिद्ध करण्यात येत आहे.

भौतिकशास्त्र विषयाबाबतच्या परिभाषानिर्मितीचे हे काम भाषा संचालनालयाने उपरोक्तप्रमाणे स्थापन केलेल्या तज्ञ समितीच्या मार्गदर्शनाखाली पूर्ण केले. या उप-समितीने एकूण १३,००० इंग्रजी शब्दांचे मराठी पर्याय निश्चित केले.

या उपसमितीवरील सदस्यांची नावे स्वतंत्रपणे दिलेली आहेत. त्यांच्याव्यतिरिक्त डॉ. सी. मांडे, डॉ. बी. बी. लाड, डॉ. डी. जी. कापडनीस यांचेही या कार्यात सहकार्य लाभले आहे.

उपसमितीच्या बैठकींना अभ्यागत म्हणून निरनिराळ्या विद्यापीठांचे संस्कृतज्ञ व त्या विषयाचे तज्ञ प्राध्यापक उपस्थित राहिले व त्यांनी या कामात मूल्यवान मदत केली.

उपसमितीवर सदस्य-सचिव या नात्याने भूतपूर्व भाषा उप संचालक डॉ. व. गो. अयाचित व श्री. शं. ना. नवरे यांनी काम केले. या कार्यात भूतपूर्व भाषा संचालक, डॉ. वा. ना. पंडित, श्री. के. मा. आराध्ये व डॉ. वा. म. कुलकर्णी यांचेही मार्गदर्शन लाभले आहे. या उपसमितीचे अध्यक्ष श्री. गो. रा. परांजपे यांनी या कामात अत्यंत परिश्रम घेतले व अनेक उपयुक्त सूचना केल्या. तसेच, संपूर्ण कोश तपासून पाहण्याचेही काम त्यांनी मोठ्या आस्थेने केले, याचा कृतज्ञतापूर्वक निर्देश केला पाहिजे.

अशा प्रकारे, अनेक तज्ञ, मान्यवर व्यक्तींच्या सहकार्याने तयार झालेला हा कोश या विषयाचे प्राध्यापक, लेखक, विद्यार्थी यांना, त्याचप्रमाणे या विषयाची आस्था असणाऱ्या अन्य व्यक्तींना तसेच संबंधित शासकीय विभागांना उपयुक्त व मार्गदर्शक ठरेल, असा विश्वास वाटतो.

परिभाषेची उपयुक्तता प्रत्यक्ष वापराने सिद्ध होत असल्याने कालांतरानेच तिचे मूल्यमापन होऊ शकेल.

**य. शं. कानिटकर,**
भाषा संचालक
व सदस्य-सचिव, भाषा सल्लागार मंडळ

महाराष्ट्र दिन :
दिनांक १ मे १९८०

## दोन शब्द

"भौतिकशास्त्र" या विषयाची परिभाषा निर्माण करण्यासाठी भाषा संचालनालयाने परिभाषा कोशाची प्रथम आवृत्ती एप्रिल १९८१ मध्ये छापली होती. आता या आवृत्तीचे पुनर्मुद्रण करण्यात आले आहे. प्रथम आवृत्ती-प्रमाणेच विषयाच्या सुलभ आकलनासाठी, त्याचप्रमाणे या विषयावरील पाठ्यपुस्तके लिहिण्यासाठी या परिभाषा कोशाची मदत होईल, अशी आशा वाटते.

**न. ब. पाटील**
भाषा संचालक,
महाराष्ट्र राज्य.

मुंबई,
दिनांक १७-९-८७

अथ यो वाग्योगवित् ।
विज्ञानं तस्य शरणम् ।।

—पातंजल महाभाष्य

" *The development of Scientific terminology must be viewed as a dynamic process which has an impact on, and which in its turn is influenced by, the growth and progress of science and language.* "

Dr. D. S. Kothari : *The Problem of Scientific and Technical Terminology.*

## कोशपरिचय

भौतिकशास्त्र हे 'मूलभूत विज्ञानांच्या' (बेसिक सायन्सेस) कक्षेत येणारे शास्त्र असून, आजच्या वैज्ञानिक दृष्टचा प्रगत यंत्रयुगातील अनेक नवनवीन शोध, नव्या वैज्ञानिक संकल्पना आणि आधुनिक तंत्रज्ञान बहुंशी भौतिकशास्त्रातील मूलभूत सिद्धांतांच्याच पायावर आधारलेले आहे. सध्याच्या अनेक उपयोजित शास्त्रांना, विद्याशाखांना व निरनिराळचा व्यवसायांच्या ज्ञानांना ते उपकारक ठरले आहे आणि त्यामुळे या शास्त्राला वैज्ञानिक क्षेत्रात अनन्यसाधारण महत्त्व आहे.

आजच्या युगातील शास्त्र व तंत्र यांच्या ज्ञानांचा वेग पाहता, आपल्या भाषेतून ते उपलब्ध करून देण्याच्या दृष्टीने परिभाषानिर्मितीचा अवलंब करणे सध्या तरी अपरिहार्य दिसते. ही गोष्ट लक्षात घेता, या विद्याशाखेतील शास्त्रीय संकल्पनांच्या व त्यावर आधारलेल्या उपयोजित ज्ञानांच्या नेमक्या अभिव्यक्तीसाठी त्या विद्याशाखेची एक स्वतंत्र अशी शास्त्रशुद्ध एकरूप मराठी परिभाषा निर्माण व्हावी यादृष्टीने ही भौतिकशास्त्राची परिभाषा तयार करण्यात आली आहे. तसेच, महाराष्ट्र राज्याच्या भाषिक धोरणास अनुसरून, राज्यातील सर्व विद्यापीठांना पदव्युत्तर स्तरांपर्यंत या शास्त्राचे मातृभाषेतून शिक्षण देता यावे; या विद्याशाखेतील तज्ज्ञ व्यक्तींना, या शास्त्रातील विद्यापीठीय स्तरांवर शिकवल्या जाणाऱ्या सर्व विषयांची मराठीतून प्रमाण पाठचपुस्तके लिहिता यावीत; राज्याच्या सर्व भागांमध्ये एकरूपतेने वापरता येईल अशी या विद्याशाखेची एक शास्त्रीय भाषा उपलब्ध व्हावी; आणि इतकेच नव्हे तर, या विद्याशाखेतील सर्व विशेषज्ञ व्यक्ती, विचारवंत व जिज्ञासू विद्यार्थी आणि तसेच जनसामान्य या सर्वांसाठी या शास्त्राचे निश्चितार्थक असे पारिभाषिक माध्यम प्रस्थापित व्हावे या हेतूनेही या कोशाची रचना केली आहे.

विश्वातील सर्व भौतिक वस्तू (मटेरिअल ऑब्जेक्ट्स्), गुरुत्वाकर्षणासारख्या शक्ती आणि प्रकाश, ध्वनी, वगैरेंसारख्या ऊर्जा व त्यांचे आविष्कार यांच्याशी निगडित असलेल्या या शास्त्राची इतकी प्रगती झाली आहे की, त्याची प्रकाशिकी (ऑप्टिक्स्), ध्वनिकी (अकाउस्टिक्स्) यांसारखी अनेक उपशास्त्रे निर्माण झाली आहेत. प्रस्तुत कोशात त्या सर्वांच्या संज्ञांचे संकलन करण्यात आले आहे. भौतिकशास्त्राचा, गणित-शास्त्र व रसायनशास्त्र यांच्याशी अन्योन्य संबंध येत असल्याने, त्या शास्त्रातील महत्त्वाच्या संज्ञांचाही या कोशात समावेश केला आहे. तसेच, भूशास्त्र, अभियांत्रिकी यांसारख्या विषयांतीलही महत्त्वाच्या संज्ञा येथे घेतल्या आहेत.

### परिभाषा, पारिभाषिक संज्ञा व पर्यायप्रक्रिया

आजच्या प्रगतिशील शास्त्रीय जगात मानवी जीवनातील प्रत्येक क्षेत्राचा विकास व विस्तार होत आहे व त्यांच्या बरोबरीने भाषेलाही आपली पावले टाकावी लागत आहेत. शास्त्रीय व तांत्रिक स्वरूप असलेल्या प्रत्येक व्यवहारात भाषेला वेगळेपणा

आलेला आहे, तिने आपला वेगळा प्रपंच थाटला आहे. ही व्यवहारविशिष्ट वेगळी भाषा म्हणजेच त्या त्या व्यवहारातील परिभाषा होय. अशा परिभाषेत तांत्रिक स्वरूप असलेल्या व ज्यांना त्याच शास्त्राच्या विशिष्ट पारिभाषिक संज्ञा म्हणता येईल अशा शेकडो, सामान्य भाषेहून वेगळ्या व अपरिचित शब्दांचा व त्यांच्याच जोडीला सामान्य भाषेतील अनेक नित्यपरिचित शब्दांचा समावेश होत असतो. परिभाषेची जडणघडण समजून घेण्याकरिता पारिभाषिक संज्ञा म्हणजे काय हे पहावे लागते.

## पारिभाषिक संज्ञा

'चेंबर्स टेक्निकल डिक्शनरी' मधील प्रस्तावनेत पारिभाषिक संज्ञेची जी व्याख्या केली आहे, त्या व्याख्येनुसार, 'एखाद्या ज्ञानविज्ञानाच्या क्षेत्रातील विशेषज्ञ व विद्वान व्यक्ती यांना ज्या शब्दांचे किंवा वाक्प्रयोगांचे विशेष महत्त्व असते आणि ज्यांच्या सहाय्याने त्या व्यक्ती आपल्या कल्पना यथातथ्यपणे व नेमकेपणाने शब्दबद्ध करतात' ते सर्व शब्द पारिभाषिक संज्ञा म्हणून ठरतात. अशा पारिभाषिक संज्ञांमध्ये, hysteresis, nucleus, parabola, spin, torque यांसारखे 'शुद्ध पारिभाषिक शब्द', affinity, argument, critical, function, neighbourhood, set, trough यांसारखे 'अर्धपारिभाषिक शब्द' आणि परिभाषेत त्यांचा वापर होत असतांना वारंवार प्रयुक्त होणारे form, glass, map, machine, mineral, particle, transfer, travel यांसारखे 'सामान्य शब्द' सुद्धा अंतर्भूत होत असतात. शास्त्राच्या पारिभाषिक कोशात अशा प्रकारे 'विशेषज्ञांना किंवा विद्वानांना' विशेष महत्त्वाच्या अशा शुद्ध पारिभाषिक स्वरूपाच्या शेकडो संज्ञा समाविष्ट कराव्या लागतातच, परंतु त्यात दैनंदिन व्यवहारातील सामान्य व पारिभाषिक अशा दोन्ही अर्थी प्रयुक्त होणारे अर्धपारिभाषिक स्वरूपाचे अनेक शब्दही पारिभाषिक संज्ञा म्हणून अंतर्भूत करावे लागतात. कारण त्यांना त्या त्या विशिष्ट क्षेत्रात एक विशिष्ट अर्थ असतो आणि हा विशिष्ट अर्थ त्यांना त्या क्षेत्रातील विशेषज्ञांकडून प्राप्त झालेला असतो. तसेच, अशा कोशात उपरोक्त पारिभाषिक व अर्धपारिभाषिक शब्दांच्या जोडीला सामान्य व्यवहारात व तसेच शास्त्रविज्ञानादि क्षेत्रात समान अर्थाने व्यवहृत होणारे पुष्कळसे दररोजच्या भाषेतील सामान्य शब्द देखील अंतर्भूत होत असतात. कारण, शास्त्रविज्ञानादि विषयांच्या संदर्भात त्यांचा उपयोग पारिभाषिक शब्दांसारखाच होत असतो. पुष्कळदा आपला नेहमीचा अर्थ न बदलताही हे सामान्य शब्द एकाच निश्चित अर्थी पारिभाषिक शब्द म्हणून वापरले जाऊ शकतात व अशा रीतीने तेही पारिभाषिक संज्ञा म्हणून ठरतात. या कोशात भौतिकशास्त्रातील अशा प्रकारच्या सर्व शब्दांचे संकलन केले आहे.

सामान्य व्यवहाराच्या गरजा भागवण्यासाठी नित्यपरिचित व मर्यादित स्वरूपाचा शब्दसंग्रह पुरा पडतो. परंतु, शास्त्रतंत्रादि ज्ञानांच्या विशिष्ट गरजा भागवण्यासाठी, त्यांचा विशेष आशय व्यक्त करण्यासाठी सामान्य शब्दांहून वेगळा व स्वतंत्र असा शब्दसंग्रह तयार करावा लागतो. ज्ञानविज्ञानाच्या निरनिराळ्या शाखांची आज जी झपाट्याने वाढ होत आहे, तिच्यामुळे नित्यश: नवे विचार, नव्या कल्पना व्यक्त करण्यासाठी नवे नवे शब्द शोधून काढण्याची आवश्यकता भासत असते व त्यांची

अशा संग्रहात भर घालावी लागते. यातील शब्दांचा अर्थ हा त्या त्या विशिष्ट क्षेत्रातील व्यवहारसिद्ध अनुभव किंवा तथ्ये व्यक्त करीत असतो. शास्त्रव्यवसायादि क्षेत्रात वापरण्यात येणाऱ्या शब्दांचा अर्थ हा निश्चित व एकार्थवाचक स्वरूपातच ग्रहण केला जावा अशी अपेक्षा असते. या शब्दसंग्रहातील शब्द हे त्यांच्या व्याख्येतून स्पष्ट होणाऱ्या कल्पनेचे केवळ ध्वनिरूप प्रतीक असतात. हे शब्द तदर्थवाचक शब्द म्हणूनच बद्धमूल व्हावयाचे असतात. दैनंदिन व्यवहारात सामान्य स्वरूपाची जी भाषा वापरली जाते ती अर्थाचा हा नेमकेपणा पूर्णतया व्यक्त करू शकत नसल्यामुळे, शास्त्रीय विषयांना त्यांची वेगळी अशी स्वतंत्र परिभाषा असणे आवश्यक ठरते. वस्तुत:, प्रत्येक शास्त्रीय परिभाषेला आपला स्वत:चा एक स्वतंत्र शब्दसंग्रह असतो. भविष्यात, कदाचित, अशा परिभाषेला आपले स्वत:चे वेगळेच व्याकरणही राहू शकेल.

प्रत्येक विकासशील समाजाला आपल्या निरनिराळ्या क्षेत्रातील प्रगतीच्या अनुरोधाने आपली भाषा व परिभाषा वाढवावी लागते. अशा परिस्थितीत ही परिभाषा यदृच्छया सावकाश वाढेल म्हणून थांबतो म्हटले, तर सभोवतालच्या प्रगतीचा झंझावाती वेग लक्षात घेता ते शक्य नाही. परिभाषानिर्मितीचेही आता एक तंत्र झाले आहे. तसेच परिभाषेची लक्षणे व ती योग्य रीतीने निर्माण करण्याची पद्धतीही आता ठरून गेलेली आहे.

परिभाषेचा विकास होण्यासाठी भाषेचे आधुनिकीकरण (मॉडर्नायझेशन) करणे व ती लेखननिविष्ट करणे (ग्रॅफिझेशन) आवश्यक ठरते. आधुनिकीकरणाच्या प्रक्रियेत अनेक नवनवीन शब्द किंवा वाक्प्रयोग तयार करून त्यांची भाषेच्या शब्दसंग्रहात भर टाकावी लागते. नव्याने प्रचलित झालेले शब्द जसे कोशात येतात, तसेच नव्याने घडविलेले शब्दही कोशातून भाषेत जात असतात. नव्याने निर्माण केलेल्या परिभाषेच्या विकासासाठी ती लेखननिविष्ट करणे महत्त्वाचे असते. अशा परिभाषेचा लेखनात वारंवार उपयोग केल्याने ती परिभाषा कालांतराने रूढ होत असते.

### परिभाषानिर्मिती व पर्यायप्रक्रिया

शास्त्रीय परिभाषेच्या निर्मितीसाठी ज्या प्रक्रियेने शब्दसिद्धी करण्यात येते, त्या प्रक्रियेत सर्वसाधारणत: पुढील चार पद्धतींचा अवलंब करण्यात येत असतो. यांत (१) एखादा अगदी नवा शब्द तयार करण्यात येतो, किंवा (२) आधीच्याच एखाद्या शब्दावरून शब्दसिद्धीच्या नेहमीच्या प्रक्रियेने दुसरा शब्द निर्माण करण्यात येतो, किंवा (३) दुसऱ्या एखाद्या भाषेतून एखादा शब्द उसनवार घेण्यात येतो, अथवा (४) अस्तित्वात असलेल्या एखाद्या शब्दाला त्या त्या संदर्भात वेगळा अर्थ देण्यात येतो. वैज्ञानिक अथवा शास्त्रीय परिभाषा तयार करताना कधीकधी गरजेनुसार मिश्र शब्द (हायब्रिड वर्ड्स्) सुद्धा तयार करावे लागतात व हे भाषाविकासाच्या स्वाभाविक प्रवृत्तीस अनुसरूनच असते. परिभाषानिर्मितीच्या या पद्धती भारत सरकारने नेमलेल्या भाषा आयोगानेही आपल्या परिभाषाविषयक शिफारशींमध्ये अंतर्भूत केल्या असून, या कोशातील संज्ञांची पर्यायनिश्चिती करताना त्यांचाच येथे वापर करण्यात आलेला आहे. प्रस्तुत कोशात, bath—मज्जनी, brazing—पिझाळण, hysteresis—पूर्वग्रहज, modulation—आपरिवर्तन, plane—प्रतल, reactance—प्ररोध, scanning—क्रमवीक्षण, smog—धूहार, यांसारखे अगदी नव्याने तयार केलेले अनेक शब्द आढळतील. तसेच,

कोशात मूळ शब्दांवरून म्हणजेच नाम, धातू, विशेषण, इत्यादींपासून प्रत्ययोपसर्गादिकांच्या सहाय्याने तयार केलेले, aberration—विपथन, alloy—संमिश्र, environment—पर्यावरण, chopper—शकलक, knock-on-atom—प्रघातक्षिप्त अणु, magnitude—अभिमिति, reaction—अभिक्रिया, symmetry—सममिति, यांसारखे असंख्य साधित शब्द दिसून येतील. crystallise, magnetise, polarise, यांसारख्या अनेक शब्दांच्या 'स्फटिकीकरण करणे, चुंबकीकरण करणे, ध्रुवीकरण करणे' अशांसारख्या लांबलचक पर्यायांऐवजी त्यांकरिता जमेल तेथे 'स्फटन करणे, चुंबकित करणे, ध्रुवित करणे' असे छोटे व सुटसुटीत पर्याय येथे घेतलेले दिसतील. याच प्रक्रियेने, crystallisation, magnetisation, polarisation अशा त्यांच्या नामार्थी संज्ञांसाठी 'स्फटिकीकरण, चुंबकीकरण, ध्रुवीकरण' अशा पर्यायांऐवजी केवळ 'स्फटन, चुंबकन, ध्रुवण' असे पर्याय दिलेले आढळतील. याच धर्तीवर bisection—अर्धन, approximation—निकटन, heating—ऊष्मन, processing—प्रक्रियण, signaling—संकेतन, असे अनेक पर्याय तयार केलेले आढळून येतील. तसेच, demagnetisation, demodulation, exhaustion, अशा संज्ञांसाठी विचुंबकन, अनापरिवर्तन, निःशेषण, अशांसारखे पर्यायही केलेले आढळतील. जेथे hygrometer, pyrometer, tensiometer यांसारख्या शब्दांत शेवटी '—meter' हा मापन उपकरण किंवा साधनदर्शक शब्द जोडलेला आहे, तेथे त्यांसाठी '–मापक' या प्रत्ययवजा शब्दाऐवजी '–मापी' असे घेऊन, आर्द्रतामापी, उत्तापमापी, पृष्ठताणमापी असे पर्याय तयार केले आहेत. 'मापक' म्हणजे 'मापन करणारी व्यक्ती' असा त्यावरून बोध होऊ नये व तसेच ते एक उपकरण, साधन किंवा यंत्र आहे असे त्यावरून स्पष्ट व्हावे, एवढाच तेथे हेतू आहे. याच तऱ्हेने —graph, —scope, —oid, —sphere अशांसारखे प्रत्यय शेवटी असलेल्या seismograph, electroscope, spheroid, photosphere यांसारख्या अनेक शब्दांकरिता '–लेखी, –दर्शी, –आभ (त्यासारखा दिसणारा या अर्थी), –आवरण' हे प्रत्ययवजा शब्द जोडून, त्यांचे 'भूकंपलेखी', 'विद्युतदर्शी', 'गोलाभ', 'तेजावरण' असे पर्याय बनवलेले दिसून येतील. उपकरण, साधन, यंत्रे इत्यादि दाखवण्याकरिता पुष्कळ वेळा '–त्र' '–ई' सारखे प्रत्यय जोडूनही condenser—संघनित्र, संघननी, telecamera—दूररूपित्र, cooler—शीतनी, drill—वेधनी, receiver—ग्राही, reactor—क्रियाधानी, अशांसारखेही अनेक पर्याय या कोशात समाविष्ट केलेले आहेत. त्याचप्रमाणे काही अन्य प्रत्ययांचा वापर करून 'attenuate—क्षीणित, illuminating—दीपनकारी, electrically-maintained—विद्युतपोषित' अशांसारखेही साधित पर्याय येथे दिलेले आहेत. dew-point, melting-point, colour index, refractive index, diopter अशांसारख्या संज्ञांमध्ये जेथे घटनेच्या एका आविष्काराचा दुसऱ्याशी संबंध दर्शवणारा अंक किंवा अंकात्मक पद असते, तेथे 'निर्देशांक' या शब्दाऐवजी '–अंक' असे शेवटी जोडून त्यांकरिता 'दवांक, द्रवणांक, वर्णांक, अपवर्तनांक, भिंगांक' इत्यादींसारखे अनेक सुटसुटीत पर्याय तयार केलेले दिसतील. शक्य तेथवर वैद्युत, स्थैतिक, अशी विशेषणवाचक रूपे टाळली आहेत. याप्रमाणे आधीच्याच एखाद्या शब्दावरून निरनिराळ्या प्रत्ययोपसर्गादिकांच्या मदतीने वेगवेगळ्या तऱ्हेने सिद्ध केलेले पुष्कळसे पर्याय या कोशात बनवलेले सापडतील.

दुसऱ्या एखाद्या भाषेतून म्हणजेच इंग्रजीतून उधारउसनवार घेतलेल्या शब्दांच्या बाबतीत, उदाहरणादाखल, येथे स्वीकारलेल्या 'बेअरिंग, बॅटरी, लिटर, मीटर, थर्मिस्टर, केबल, कॅलरी, सिलिंडर, अशा पुष्कळशा शब्दांचा निर्देश करता येईल. अर्थात, आंतरराष्ट्रीय स्वरूपाच्या सर्व संज्ञा, मूलद्रव्ये, संयुगे वगैरेंची नावे त्यांच्या इंग्रजी स्वरूपांत जशीच्या तशीच लिप्यंतरित करून घेतलेली आहेतच. तसेच, अस्तित्वात असलेल्या शब्दांचा अर्थ बदलून तो विवक्षित आशयाशी जुळता करून घेऊन अर्थानुकूलनाच्या प्रक्रियेने torque—आघूर्ण, torsion—मोटन, spin—आभ्राम, inertia—जडत्व, plasma—आयनायु, solid, liquid, fluid—स्थायु, द्रव, द्रायु यांसारखे अनेक शब्द आणि उपशास्त्रे दर्शविण्यासाठी हिंदीच्या धर्तीवर acoustics—ध्वनिकी, optics—प्रकाशिकी, असेही शब्द येथे घेतलेले आढळतील.

## मिश्र शब्द (हायब्रिड वर्ड्स्)

संज्ञांची पर्यायनिश्चिती करताना काही ठिकाणी परकीय शब्दांना मराठीची प्रत्ययप्रक्रिया लावून, त्यांकरिता या कोशात नवीन मराठी रूपे बनवलेली आहेत. या संबंधात cupellation—क्युपेलन, mercurisation—मर्क्यूरन, pasteurisation—पाश्चरण, decarbonisation—विकार्बनन, ferromagnetism—फेरोचुंबकत्व, eigenfunction—आइगेनफल, caloric—कॅलरिक, electronic—इलेक्ट्रॉनी, anodic—ॲनोडी, voltage—व्होल्टता, इत्यादि अनेक शब्द येथे उदाहरणादाखल देता येतील. पुष्कळदा प्रचलित असलेल्या अनेक परकीय शब्दांना मराठीची व्याकरणप्रक्रिया सामावून घेऊ शकत नाही. अशा वेळी त्या शब्दांबरोबरच त्यांचे मराठी पर्यायही दिलेले आढळतील. परिभाषा निर्माण करताना मिश्र शब्द बनवण्याच्या या प्रवृत्तीचा कधी कधी अनिवार्यपणे अवलंब करावा लागतो.

## कोशरचना

या कोशातील पारिभाषिक संज्ञांचे संकलन करताना, 'The International Dictionary of Physics and Electronics', केंद्रीय हिंदी संचालनालयाची 'विज्ञान शब्दावली', भारत सरकारच्या शिक्षण मंत्रालयाची 'विज्ञान शब्दावली–दोन (स्नातकोत्तर स्तर)', श्री. गो. रा. परांजपे यांनी संपादित केलेला 'वैज्ञानिक पारिभाषिक संज्ञा' हा शब्दकोश यांचा आधार घेतला आहे. सर्वसाधारणपणे केंद्र सरकारच्या शास्त्रीय व तांत्रिक आयोगाने पारिभाषिक शब्दावल्या प्रकाशित करताना ज्या धोरणाने अशा संज्ञांचे संकलन केले, त्याच धोरणाचा अवलंब करून प्रस्तुत कोशाची रचना केली आहे. विशेषत: कोशाची रचना पुढीलप्रमाणे केली आहे :–

(१) इंग्रजी संज्ञा (२) तिची इंग्रजीतील शब्दजाती (३) जरूर तेथे विषयनिर्देशक संक्षेप (४) अर्थच्छटा क्रमांक (५) कोशातील पर्याय इंग्रजी संज्ञेच्या ज्या अर्थाने घेतला आहे, तो अर्थ किंवा अर्थच्छटा विशद करणारे इंग्रजी स्पष्टीकरण (६) संज्ञेचा मराठी पर्याय (७) मराठी पर्यायाचा लिंगनिर्देश (क्वचित जाती) (८) जरूर तेथे मराठी पर्यायाचा करून दाखवलेला उपयोग (९) इंग्रजी वाक्प्रयोगाचा मराठी पर्याय (१०) शब्दकुळे व (११) जोडसंज्ञा.

**इंग्रजी संज्ञा व शब्दानुक्रम**

कोशात समाविष्ट केलेल्या सर्व संज्ञा जाड व ठळक (बोल्ड) मुद्राक्षरांत छापल्या आहेत. प्रत्येक संज्ञेसमोर स्वल्पविराम दिला आहे. संज्ञेतील इंग्रजी शब्द देताना, Chambers's Technical Dictionary आणि Webster's New International Dictionary, यांचा आधार घेतला आहे, आणि सर्वसाधारणपणे त्या कोशांमध्ये तो शब्द जसा दिला आहे, तसाच तो येथेही ठेवला आहे. इंग्रजी संज्ञांचे शब्दकोशात लेखन करताना त्यांच्या सुरुवातीचे पहिले अक्षर 'कॅपिटल' रूपात देण्याची पद्धत आजकाल रूढ नसल्याने, या कोशातील संज्ञांचीही सुरुवात 'स्मॉल' अक्षरांनी केलेली आहे. तथापि, शास्त्रज्ञांच्या नावावरून आलेल्या संज्ञांची (curie, volt यांसारखी मापन युनिटे इत्यादींच्या संज्ञा वगळून) सुरुवात मात्र 'कॅपिटल' अक्षरांनी केलेली आहे.

इंग्रजी संज्ञांचा अनुक्रम लावताना निरनिराळ्या शब्दकोशांमध्ये निरनिराळ्या पद्धतींचा अवलंब केला असल्याचे आढळून येते. तथापि, या कोशात Webster's New International Dictionary मधील पद्धती अनुसरण्यात आली आहे. मुख्य शब्द असो वा जोडशब्द असो, वाक्प्रयोग असो वा शब्दसमुच्चय असो अथवा एखादा शब्द संक्षेप म्हणून असो, तो जणू एकच शब्द आहे असे मानून, त्याच्या वर्णलेखनातील (spelling) वर्णानुक्रमाप्रमाणे त्याचा क्रम लावला आहे. आजकाल हीच पद्धती प्रामुख्याने अवलंबली जात आहे. शास्त्रीय व वैज्ञानिक पारिभाषेत ग्रीक वर्णमालेतील मुळाक्षरांचा संकेतचिन्हे म्हणून वारंवार वापर करण्यात येत असतो. ही मुळाक्षरे त्यांच्या उच्चारांच्या वर्णानुक्रमाने वर्णाच्या सुरुवातीस दिली आहेत.

align, cathode, centre, ether, ecology, igniter, litre, kinematics यांसारख्या अनेक संज्ञांचे वर्णलेखन, अनुक्रमे aline, kathode, center, aether, aecology किंवा oecology, ignitor, liter, cinematics, याप्रमाणे दोन किंवा अधिक प्रकारे केले जाते. अशा प्रसंगी, त्या संज्ञांच्या रूढ वर्णलेखनाखाली त्यांचे पर्याय दिलेले आहेत, व दुसऱ्या प्रकारच्या वर्णलेखनाची संज्ञा त्या त्या वर्णात वर्णानुक्रमाने देऊन, ती aline = align, kathode = cathode, center = centre, aether = ether, aecology = ecology, ignitor = igniter, liter = litre, cinematics = kinematics याप्रमाणे दर्शविली आहे. त्याचप्रमाणे hypersensitivity – supersensitivity, photocell – photoelectric cell यांसारख्या दोन भिन्न इंग्रजी संज्ञा एकाच अर्थाने रूढ असतील, तर त्यांपैकी एका संज्ञेपुढे तिचे पर्याय दिले आहेत, आणि दुसरी संज्ञा वर्णानुक्रमे जेथे येईल, तेथे त्या संज्ञेपुढे = असे चिन्ह देऊन पहिली संज्ञा दर्शवली आहे. तसेच, अशा प्रकारच्या संज्ञांखाली कंसात *also* किंवा *also* called असे देऊन समानार्थी किंवा पर्यायी वर्णलेखनाचे शब्द दिले आहेत.

atmospherics, data, proceeds, strays यांसारख्या पुष्कळशा संज्ञा बहुतेक अनेकवचनी रूपातच वापरण्यात येतात. तसेच, mechanics, statics, thermionics सारख्या संज्ञा ह्या अनेकवचनी रूपात रूढ असल्या, तरी त्यांचा एकवचनी रूप म्हणूनच वापर करण्यात येतो. अशा संज्ञा त्यांच्या वर्णलेखनामधील वर्णानुक्रमे अनेकवचनी रूपातच

स्वतंत्रपणे दिल्या आहेत. एखादी संज्ञा अनेकवचनी रूपात दिली असेल, परंतु तिचे एकवचनी रूप निराळे होत असेल, तर त्या संज्ञेपुढे कंसात तिचे एकवचनी रूप दिले आहे. त्याचप्रमाणे, criterion, momentum, spectrum यांसारख्या एखाद्या संज्ञेचे अनेकवचनी रूप निराळे किंवा अनियमित होत असेल, तर त्या संज्ञेपुढे कंसात तिचे निराळे किंवा अनियमित अनेकवचनी रूपही दिले आहे. संज्ञांच्या अनेकवचनी रूपांत त्यांचा पर्याय बदलत असेल, तर तो पर्याय देताना त्याअगोदर in *pl.* असे कंसात दर्शवले आहे. dextro—, helio—, levo—, micro— यांसारखे जे शब्द अन्य शब्दां-बरोबर प्रयुक्त होतात, त्यांच्यापुढे in comb. (म्हणजे used in combination) असे कंसात दर्शविले आहे.

crystallise, neutralise, systematise, यांसारख्या शब्दांमध्ये 'ise' हे अंत्यविकरण लागलेले असते. अशा तऱ्हेच्या शब्दांना 'ise' ऐवजी 'ize' असे अंत्यविकरण लावून त्यांचे वर्णलेखन crystallize, neutralize, systematize असेही करण्यात येते. प्रस्तुत कोशात असे शब्द 'ize' या अंत्यविकरणाऐवजी 'ise' हे अंत्यविकरण लावून देण्यात आलेले आहेत.

**इंग्रजी संज्ञांची शब्दजाती**

प्रत्येक संज्ञेपुढे तिची इंग्रजीतील मूळ जाती दर्शवली आहे. इंग्रजी संज्ञेचे पर्याय निश्चित करताना तिची मूळ शब्दजाती लक्षात घेणे आवश्यक असते व त्याप्रमाणे पर्यायांचीही तीच जाती असावी लागते. जेथे एकच शब्द क्रियापद, नाम किंवा विशेषण अशा अनेक प्रकारे प्रयुक्त होत असेल, तेथे तो शब्द मूलतः ज्या शब्दजातीत प्रथमतः प्रयुक्त होतो ती जाती प्रथम देऊन इतर जाती क्रमाने दिलेल्या आहेत. ह्या जाती दर्शवण्यासाठी *v.t.*, *v.i.*, *n.*, *adj.*, *adv.*, इत्यादींसारख्या संक्षेपांची योजना केलेली आहे. या संक्षेपांसाठी इटॅलिक मुद्राक्षरे वापरण्यात आली असून, प्रत्येक शब्दजाती स्वतंत्र परिच्छेदात दिली आहे.

**विषयनिर्देशक संक्षेप**

एखादी संज्ञा किंवा जोडसंज्ञा एखाद्या निराळ्या शास्त्रातील किंवा उपशास्त्रातील अथवा एखाद्या विषयातील पारिभाषिक संज्ञा म्हणून असेल, तर तिचे पर्याय देण्यापूर्वी ते विवक्षित शास्त्र किंवा उपशास्त्र अथवा तो विषय दर्शवणारा संक्षेप तेथे दिला आहे. विषयनिर्देशक संक्षेप इंग्रजीतून दिले असून, त्यासाठी देखील इटॅलिक मुद्राक्षरे वापरली आहेत व त्यांच्या संक्षेपाचे पहिले अक्षर कॅपिटल घेतले आहे. संज्ञेच्या अनेक अर्थच्छटा व्यक्त करणारे पर्याय देताना, एखादा पर्याय विशिष्ट शास्त्राच्या किंवा उपशास्त्राच्या संदर्भात वापरला जात असल्यास, ते शास्त्र किंवा उपशास्त्र दर्शवणारा संक्षेप अर्थच्छटा क्रमांकानंतर दिला आहे. एखाद्या पर्यायाला विषयनिर्देशक संक्षेप दिला आहे या एवढ्याच कारणावरून तो पर्याय त्या शास्त्राव्यतिरिक्त किंवा उपशास्त्राव्यतिरिक्त इतर ठिकाणी त्या अर्थाने प्रयुक्त होत नाही असे समजू नये.

या कोशात वापरण्यात आलेल्या सर्व संक्षेपांची सूची स्वतंत्रपणे दिली आहे.

**पर्याय, अर्थच्छटा व स्पष्टीकरणे**

कोशात दिलेल्या इंग्रजी शब्दांप्रमाणेच त्यांचे पर्यायही जाड मुद्राक्षरांत छापले आहेत. भाषा सल्लागार मंडळाने पर्यायनिश्चितीसाठी आधारभूत म्हणून काही निदेशक तत्त्वे ठरवून दिली होती. त्यांच्याच आधारे या कोशात पर्यायनिश्चिती करण्यात आलेली आहे. ही आधारभूत निदेशक तत्त्वे पुढे स्वतंत्रपणे दिलेली आहेत. पर्यायनिश्चितीची सर्वसाधारण प्रक्रिया यापूर्वी नमूद केली आहेच. मराठी पर्यायांचा अर्थ व त्यांचे लेखन यांसाठी महाराष्ट्र शब्दकोशाचा आधार घेतला आहे. पर्याय देताना तो मूलत: ज्या स्वरूपात असेल त्याच स्वरूपात म्हणजे प्रातिपदिक स्वरूपात ठेवला आहे. 'आर्द्रता निष्कासन' (dehumidification) यासारख्या पर्यायामध्ये जेथे दोन किंवा अधिक शब्द आले आहेत, तेथे ते तोडून लिहिले असले तरी असे पर्याय सामासिक स्वरूपातच आहेत असे समजावे. शब्दांचे समानार्थी पर्याय किंवा समान अर्थच्छटा व्यक्त करणारे अनेक पर्याय स्वल्पविराम देऊन अलग अलग दर्शवले आहेत. शब्दांच्या विविध अर्थच्छटांना क्रमांक दिले आहेत. संज्ञेचा मुख्य अर्थ किंवा लक्षितार्थ ध्यानात घेऊन मराठी पर्यायांची निश्चिती करण्यात आली आहे. मुख्य अर्थ किंवा लक्षितार्थ स्पष्ट करण्याच्या हेतूने आवश्यक त्या ठिकाणी संज्ञांची इंग्रजी स्पष्टीकरणे दिली आहेत. dip-circle, magic numbers यांसारख्या अनेक शब्दोत्पत्तिशास्त्रदृष्टचा अपशब्द (misnomer) म्हणून असणाऱ्या संज्ञांचा खरा अर्थ स्पष्ट व्हावा असाही त्यामागे हेतू आहे. शास्त्रज्ञांच्या नावांवरून आलेल्या संज्ञांच्या बाबतीत जमेल तेथे संबंधित शास्त्रज्ञांची नावेही इंग्रजीतून दिलेली आहेत. इंग्रजी स्पष्टीकरणे देताना संज्ञांची व्याख्या करण्याचा उद्देश नाही; पर्याय नेमक्या ज्या अर्थाने घेतला आहे तो अर्थ स्पष्ट व्हावा एवढाच येथे मर्यादित उद्देश आहे. स्पष्टीकरणासाठी 'Chambers's Technical Dictionary', 'Webster's New International Dictionary' व 'The International Dictionary of Physics and Electronics' यांचा आधार घेतला आहे. मराठी पर्यायांचा बिनचूक वापर करता यावा यादृष्टीने आवश्यक त्या प्रसंगी कंसात 'as in :' असे देऊन त्या पर्यायांचा उपयोग करून दाखवला आहे. स्पष्टीकरणे देताना व पर्यायांचा उपयोग करून दाखवताना इंग्रजीच्या व मराठीच्या बारीक रोमन मुद्राक्षरांची योजना केली आहे. मराठीत लिप्यंतर करून स्वीकारलेल्या इंग्रजी संज्ञांचे उच्चारण वेब्स्टर न्यू इंटरनॅशनल डिक्शनरीत दिल्याप्रमाणे घेतले आहे.

**मराठी पर्यायांची शब्दजाती**

सर्वसाधारणपणे इंग्रजी संज्ञांची जी शब्दजाती असेल, तीच शब्दजाती मराठी पर्यायांचीही राहील. इंग्रजीत एखादी संज्ञा नाम, सर्वनाम, विशेषण किंवा क्रियापद म्हणून असेल, तर त्या संज्ञेचे पर्याय देखील त्याच शब्दजातीप्रमाणे म्हणजे नाम, सर्वनाम, विशेषण किंवा क्रियापद म्हणून प्रयुक्त होतील. म्हणून प्रत्येक मराठी पर्यायापुढे त्याची शब्दजाती निर्देशित केलेली नाही. अशा प्रसंगी त्याची शब्दजाती इंग्रजी संज्ञेच्या जातीप्रमाणेच आहे असे समजावे. तथापि, काही अपवादात्मक बाबतीत संज्ञेची इंग्रजीतील मूळ शब्दजाती कायम ठेऊन, तिचा पर्याय मात्र मराठीत ज्या शब्दजातीनुसार वापरला जातो त्याच शब्दजातीच्या रूपात ठेवला आहे. जसे :— bypass, *n.* पार्श्वसारी (मार्ग वगैरे), intermediary, *n.* मध्यस्थ (पदार्थ, वस्तु, द्रव्य वगैरे)

**लिंगनिर्देश, इत्यादि**

१. नाम म्हणून प्रयुक्त होणाऱ्या संज्ञांच्या पर्यायांपुढे (पु.), (स्त्री.), (न.) किंवा (सा.) असे संक्षेप देऊन लिंगनिर्देश केला आहे. 'discoverer — शोध लावणारा' अशासारख्या पर्यायांमध्ये सामान्यतः लिंगनिर्देश पुल्लिंगात असला, तरी त्यात स्त्रीलिंगी पर्यायांचाही समावेश आहे असे समजावे. 'exponent — अभिव्याख्याता' यांसारख्या पर्यायांपुढे (पु.) असा लिंगनिर्देश केला असला, तरीही त्यात 'अभिव्याख्याती' असा स्त्रीलिंगी निर्देश आहे असे समजावे. 'computer' सारखे नामार्थी पर्याय (संगणन यंत्र सोडून) स्त्री किंवा पुरुष अशा दोन्हीही व्यक्तींना लागू होत असतील, तर अशा पर्यायांपुढे सामान्यलिंगी (सा.) असा निर्देश केला आहे.

२. विशेषणांच्या बाबतीत पर्याय देताना केवळ पुल्लिंगी एकवचनी रूपात असलेला पर्याय दिला आहे. जसे 'expended — खर्च झालेला, व्यय झालेला; flat-bottomed— सपाट बुडाचा', वगैरे. या पुल्लिंगी एकवचनी रूपांतील पर्यायांमध्ये स्त्रीलिंगी व नपुंसकलिंगी पर्यायांचाही अंतर्भाव आहे असे समजावे. काही ठिकाणी विशेषणांचे पर्याय देताना नामार्थी पर्याय देऊन त्यापुढे जोडरेघ दिली आहे. जसे, centripetal — अभिकेंद्री, अभिकेंद्र–; subatomic — अवआण्विक, अवअणु– 'centripetal force किंवा subatomic particle' अशांसारख्या जोडशब्दांचे संदर्भाप्रमाणे अनुक्रमे 'अभिकेंद्र बल, अवअणु कण' यांप्रमाणे पर्याय तयार करता येतील, एवढेच त्यावरून दाखवायचे आहे.

३. क्रियापदांच्या बाबतीत इंग्रजीत सकर्मकाला *v.t.* व अकर्मकाला *v.i.* हे संक्षेप देऊन शब्दजातींचा निर्देश केला आहे. क्रियापद इंग्रजीत सकर्मक किंवा अकर्मक असेल, तर मराठी पर्यायही अनुक्रमे सकर्मक अथवा अकर्मक आहेत असे समजावे. इंग्रजी क्रियापदाच्या सकर्मक व अकर्मक अशा दोन्हीही जाती असतील, तर इंग्रजीत *v.t. & i.* असा संक्षेप देऊन प्रथमतः सकर्मक पर्याय व नंतर अकर्मक पर्याय दिले आहेत. तथापि, contain, include सारखी क्रियापदे इंग्रजीत सकर्मक आहेत परंतु मराठीत त्यांचे पर्याय सकर्मक व अकर्मक अशा दोन्ही स्वरूपाचे असतात. अशा अपवादात्मक बाबतीत अशा पर्यायांपुढे तसा निर्देश केला नसला, तरीही तेथे ते दोन्ही प्रकारचे पर्याय प्रयुक्त होतात असे समजावे.

**शब्दकुळे**

कोशात अनेक ठिकाणी काही विवक्षित संज्ञांच्या पर्यायांखाली किंवा त्यांची एखादी विवक्षित अर्थच्छटा व्यक्त करणाऱ्या पर्यायाखाली *cf.* असे देऊन बारीक मुद्राक्षरांत एकाखाली एक असे एक किंवा अनेक शब्द समाविष्ट असणारे शब्दकुळ आढळून येईल. ज्या शब्दाखाली कुळ दिले आहे, तो त्यातील प्रमुख शब्द होय. सकृद्दर्शनी हे शब्दकुळ म्हणजे समानार्थी शब्दांची एक मालिकाच आहे असे भासते. वस्तुतः ते तसे नसून आशयाच्या दृष्टीने त्यातील प्रत्येक शब्दामध्ये एक प्रकारचा सूक्ष्म भेद अथवा फरक असतो. शब्दकुळांतील शब्दांची आधारभूत कल्पना एकच असते. परंतु, त्यातील काही शब्द कधी वेगवेगळ्या संदर्भांनुसार तर कधी निरनिराळ्या संकेतांनुसार आपापल्या सूक्ष्म

अर्थच्छटा व्यक्त करून आपापली भिन्नता दर्शवत असतात. शब्दकुळात त्याच्या प्रमुख शब्दात अनुस्यूत असलेली एखादी कल्पना मध्यवर्ती कल्पना म्हणून प्राधान्य पावते व तिच्या अर्थकक्षेत बाकीचे सर्व शब्द आपापल्या सूक्ष्म अर्थच्छटा वा संदर्भ अथवा संकेत निश्चितपणे दर्शवून, परंतु मध्यवर्ती कल्पनेशी संबंध तुटणार नाही अशा रीतीने कमीअधिक फरकाने प्रयुक्त होत असतात.

उदाहरणार्थ, प्रस्तुत कोशात 'erosion—अपक्षरण, धूप' या संज्ञेखाली 'abrasion—अपघर्षण'; 'corrasion—(प्रवाह) अपघर्षण'; 'corrosion— क्षरण, झीज,' या शब्दांचे एक शब्दकुळ दिले आहे.

या शब्दकुळातील सर्व शब्दांमधून कोणत्याही वस्तू किंवा पदार्थ झिजण्याची, त्यांची धूप होण्याची म्हणजेच त्यांचे क्षरण किंवा क्षय होण्याची मध्यवर्ती कल्पना अनुस्यूत होत असली, आणि अर्थाच्या दृष्टीने हे सर्व शब्द परस्परव्याप्त असले, तरीही या सर्व शब्दांचे आपापले संकेत व संदर्भ वेगवेगळे आहेत असे दिसून येईल. 'erosion—अपक्षरण, धूप' या शब्दातून वातावरणातील नैसर्गिक घटकांच्या क्रियेमुळे किंवा त्यांच्या संपर्कातून उद्‌भवणाऱ्या अन्य स्वरूपाच्या क्रियेमुळे कोणत्याही वस्तू किंवा गोष्टी यांची सावकाश धूप होण्याची किंवा त्यांचे अपक्षरण, म्हणजेच, झीज किंवा विघटन किंवा नाश होण्याची सर्वसाधारण व्यापक प्रक्रिया सूचित होते, तर 'corrosion—क्षरण, झीज' या शब्दातून अशी क्षरण होण्याची प्रक्रिया प्रामुख्याने रासायनिक किंवा विद्युतरासायनिक क्रियेमुळे, विशेषतः, ती ऑक्सिडीकारक (oxidising) क्रियेमुळे घडते असा संकेत तेथे ध्वनित होत असतो. 'erosion' मधील क्षरणकारी प्रक्रिया ही मुख्यत्वेकरून वातावरणातील घटक व शक्ती यांच्या नैसर्गिक 'घर्षणाच्या' क्रियेमुळे घडत असते असा संकेत तेथे गर्भित असतो, तर 'corrosion' मध्ये क्षरणकारी असा 'रासायनिक बदल' होण्याच्या क्रियेला प्राधान्य असते. 'abrasion—अपघर्षण' या शब्दातून देखील झीज होण्याचीच प्रक्रिया सूचित होत असली, तरीही तेथे ही प्रक्रिया प्रामुख्याने घर्षणाच्या क्रियेमुळे होत असल्याचे व ती साधारणतः पृष्ठभागापुरतीच मर्यादित असल्याचे अध्याहृत असते. 'corrasion—(प्रवाह) अपघर्षण' या शब्दातही वरीलप्रमाणे क्षरण किंवा धूप होण्याचीच प्रक्रिया अनुस्यूत असते; परंतु हा शब्द वेगळ्या संदर्भात वापरला जातो. विशेषतः, भूशास्त्रात हा शब्द प्रयुक्त होत असतो. हा शब्द नद्या, हिमनद्या, लाटा यांसारख्या केवळ प्रवाही गोष्टींच्या घर्षणक्रियेमुळे होणाऱ्या क्षरणाच्या संदर्भात वापरला जात असतो.

सामान्य व्यवहारात एखादी कल्पना किंवा विचार मांडताना सोयीनुसार किंवा सवयीनुसार कोणताही शब्द कोठेही वापरला जातो. कारण ती कल्पना किंवा विचार संदर्भावरून स्थूलमानाने व्यक्त झाला तरीही काम भागू शकते. परंतु शास्त्रतंत्रादि व्यवहारात आणि विशेषतः, शुद्ध शास्त्रीय विषयांचे लेखन करताना अशी परिस्थिती रहात नाही. तेथे प्रत्येक शब्द निश्चित अर्थानेच वापरावा लागतो. तो एकार्थवाचक स्वरूपातच असावा लागतो. तसेच त्याचा नेमकेपणाही पूर्णपणे व्यक्त करावा लागतो. शास्त्रातील सिद्धांत किंवा तत्त्व मांडताना, हे सकृद्दर्शनी समानार्थी वाटणारे पण आपापल्या सूक्ष्म अर्थच्छटांमुळे भिन्न आशय व्यक्त करणारे शब्द जेव्हा एकत्र प्रयुक्त होतात, तेव्हा शब्दकुळांची उपयुक्तता अत्यंत प्रकर्षाने जाणवते.

**_cf._ या संक्षेपाने दर्शवलेले पर्याय**

काही पर्यायांपुढे *cf.* या संक्षेपाची योजना करून त्यापुढे एखादा विवक्षित शब्द दर्शवला आहे. याचा अर्थ असा की, मूळ शब्दाच्या या अर्थच्छटेच्या कक्षेत येणाऱ्या सर्व शब्दांचे एक शब्दकुळ *cf.* समोर दर्शवलेल्या शब्दाखाली घेतले आहे.

**संज्ञाप्रकार**

कोशात काही महत्त्वाच्या संज्ञांखाली त्या संज्ञांचे प्रमुख प्रकार म्हणून काही महत्त्वाच्या जोडसंज्ञा दिल्या आहेत. तसेच, या संज्ञा त्या त्या वर्णाखाली सुद्धा वर्णानुक्रमे दिल्या आहेत. उदाहरणार्थ, magnet या संज्ञेचे bar magnet, electromagnet इत्यादि प्रकार त्या संज्ञेखाली दिले असून "B" व "E" वर्णांत देखील त्या आपापल्या वर्णानुक्रमे सापडतील. संज्ञाप्रकार जाड व ठळक मुद्राक्षरांत मुख्य संज्ञेपासून आत घेतले आहेत.

* * *

# भाषा सल्लागार मंडळाने वैज्ञानिक व तांत्रिक परिभाषेच्या निर्मितीसाठी आधारभूत म्हणून ठरवून दिलेली

## निदेशक तत्त्वे

१. **शब्दसंग्रह व पर्यायः—** हिंदी वैज्ञानिक व तांत्रिक परिभाषेची निर्मिती करताना केंद्र सरकारने ज्या धोरणाचा अवलंब करून विज्ञान शब्दावलीची रचना केली त्याच धोरणानुसार प्रत्येक विद्याशाखेतील शब्दांचे संकलन करावयाचे आहे. विज्ञान व तंत्र क्षेत्रांत यापूर्वी झालेल्या कार्याचा केंद्र सरकारने आढावा घेतला होता. तसेच, हे कार्य करणाऱ्या निरनिराळ्या राज्यांतील निरनिराळ्या मंडळांमार्फत व समित्यांमार्फत या क्षेत्रांत जे काम केले गेले त्याचाही समन्वय करण्याकडे केंद्र सरकारने लक्ष दिले होते. म्हणून प्रत्येक विद्याशाखेतील पारिभाषिक शब्दांचे संकलन करताना, त्या त्या शाखेची केंद्र सरकारने तयार केलेली "विज्ञान शब्दावली" आधारभूत मानून, त्याबरोबरच पुणे विद्यापीठ, माध्यमिक शिक्षण मंडळ आणि इतर विज्ञान संस्था यांनी प्रकाशित केलेल्या पारिभाषिक शब्दावल्यांमधील शब्द व त्यांचे मराठी पर्याय यांचाही विचार करावा. माध्यमिक स्तरावर वैज्ञानिक व तांत्रिक विषयांचे मराठीतून शिक्षण देण्यासाठी तयार केलेल्या पाठ्यपुस्तकांद्वाराही पुष्कळशा तांत्रिक शब्दांचे पर्याय रूढ झाले आहेत. तेव्हा अशा पाठ्यपुस्तकांत वापरण्यात आलेले पर्याय देखील विचारात घ्यावेत.

२. **आंतरराष्ट्रीय संज्ञाः—** 'आंतरराष्ट्रीय संज्ञा' या शक्यतोवर त्यांच्या प्रचलित इंग्रजी स्वरूपातच ठेवाव्यात व त्यांचे मराठी भाषेत लिप्यंतरण करावे. आंतरराष्ट्रीय संज्ञांत साधारणतः पुढील प्रकारच्या संज्ञांचा समावेश होतो :—

(अ) (एक) मूलद्रव्ये आणि संयुगे (महत्त्वपूर्ण पदे, उपपदे, वगैरेंसह) यांची नावे. ही नावे लिप्यंतरित करून देताना त्यांची संकेतचिन्हे सुद्धा द्यावीत. जसे :— हायड्रोजन (H), कार्बन (C), कार्बन डायऑक्साइड ($CO_2$).

मात्र, मूलद्रव्ये आणि संयुगे यांसाठी वापरण्यात येणारी संकेतचिन्हे व संक्षेप हे इंग्रजी लिपीत जसेच्या तसे ठेवावेत. जसे :— Cu (तांबे), $90Th^{228}$ (किरणोत्सारी थोरिअमचा समस्थानिक), $C_{10}H_{14}N_2$ (निकोटीन), NaOH (सोडिअम हायड्रॉक्साइड)

(दोन) शास्त्रीय समीकरणे, सूत्रे तसेच रासायनिक चिन्हांकित समीकरणे यांमधील इंग्रजीतील संकेतचिन्हे जशीच्या तशीच ठेवावीत. जसे :—

(१) शास्त्रीय समीकरणे—

$E = mc^2$ (वस्तुमान-ऊर्जा यांचा संबंध दर्शवणारे समीकरण)

$\frac{1}{f} = \frac{1}{v} - \frac{1}{u}$ (प्रतिमेचे व पदार्थाचे अंतर आणि नाभीय अंतर यांमधील संबंध दर्शवणारे सूत्र)

(२) रासायनिक चिन्हांकित समीकरणे–



$$NaHSO_4 + NaCl = Na_2SO_4 + HCl$$

{सोडिअम बायसल्फेट} + {सोडिअम क्लोराइड} = {सोडिअम सल्फेट} + {हायड्रोक्लोरिक आम्ल}

(तीन) गंधक (sulphur), रुपे (silver), पारा (mercury), जस्त (zinc), इत्यादि रूढ शब्द वर्णनात घेता येतील; परंतु, रासायनिक संयुगांची नावे देताना ती त्यांच्या प्रचलित इंग्रजी अथवा ग्रीक नावांप्रमाणेच द्यावीत. जसे :– सिल्व्हर क्लोराइड, वगैरे.

(ब) वजने, मापे, परिमाणे व भौतिक राशी. जसे:– ॲम्पिअर (ampere), कॅलरी (calorie), डाइन (dyne), वगैरे.

(क) विशेषनामे व त्या नामांवरून घेतलेल्या संज्ञा ह्या मूळ भाषेतील त्यांच्या उच्चारानुरूप लिहाव्यात. जसे :– फॅरनहाइट श्रेणी (फॅरनहाइट), व्होल्टामीटर (व्होल्टा), ॲम्पिअर (ॲम्पिअर), वगैरे.

(ड) वनस्पतिशास्त्र, प्राणिशास्त्र, भूशास्त्र, इत्यादींसारख्या शास्त्रीय विषयांमधील द्विपद नामसंज्ञा (binomial nomenclature).

(ई) स्थिरांक. जसे:– $\pi$, g, वगैरे.

(फ) रेडिओ, पेट्रोल, रडार, इलेक्ट्रॉन, न्यूट्रॉन, प्रोटॉन, वगैरे यांसारखे इतर सर्वत्र वापरण्यात येणारे शब्द.

(ग) गणित व इतर शास्त्रांमध्ये वापरण्यात येणारे संख्यांक, संकेतचिन्हे, चिन्हे, सूत्रे, वगैरे. जसे:– साइन (sin), कोसाइन (cos), टॅन्जंट (tan), लाग (log), वगैरे.

परंतु, गणितीय क्रिया आणि त्रिकोणमितीतील गुणोत्तरे यांमध्ये रोमन किंवा ग्रीक वर्णमालेतील अक्षरेच वापरली पाहिजेत. जसे:– $\sin^2\theta + \cos^2\theta = 1$, वगैरे.

तथापि, वर निर्दिष्ट केलेल्या पारिभाषिक संज्ञांपैकी पुष्कळशा संज्ञांना मराठीतील रूढ पर्याय उपलब्ध असून, ते शाळा, विद्यालये, इत्यादींत कित्येक वर्षांपासून रूढ आहेत. जसे :– कॅलरी – ऊष्मांक, sin — ज्या, cos — कोज्या, वगैरे. तेव्हा, आंतरराष्ट्रीय संज्ञा त्यांच्या इंग्रजी स्वरूपात जशाच्या तशा लिप्यंतरित करून स्वीकारताना, त्याबरोबरच त्या संज्ञांना मराठीत रूढ असलेले पर्याय देखील द्यावेत.

३. संकेतचिन्हे ही त्यांच्या आंतरराष्ट्रीय स्वरूपात रोमन लिपीतच राहू द्यावीत. संकेतचिन्हे म्हणून ग्रीक वर्णमालेतील अक्षरे वापरण्यात आली असतील, तर तीच अक्षरे त्यांसाठी घ्यावीत. तथापि, संज्ञांचे संक्षेप देवनागरी लिपीतून दर्शवता येतील. जसे :– cm. म्हणजे 'सेंटिमीटर' या संज्ञेचा संक्षेप 'सें. मी.' असा देवनागरी लिपीत घेता येईल.

मात्र, शास्त्रीय व तांत्रिक विषयांच्या प्रगत पाठ्यपुस्तकांत किंवा प्रमाण ग्रंथांत केवळ 'cm.' यासारखी आंतरराष्ट्रीय संकेतचिन्हे वा संक्षेप यांचाच वापर करावा.

४. कोन, त्रिकोण, चौकोन, यांसारख्या भूमितीय आकृत्यांसाठी 'अ', 'ब', 'क', 'ड' यांसारखी देवनागरी लिपीतील मराठी अक्षरे घेता येतील. परंतु, त्रिकोणमिती-मधील अन्योन्य संबंध दर्शवताना केवळ रोमन व ग्रीक वर्णमालेतील अक्षरेच वापरण्यात यावीत.

५. वैज्ञानिक व तांत्रिक पारिभाषिक शब्दांचे पर्याय निश्चित करताना, अर्थाची निश्चितता, स्पष्टता व सुबोधता यांवर अधिक भर द्यावा. शक्यतोवर अधिकाधिक भारतीय भाषांमध्ये वापरता येतील असेच पर्याय निवडावेत; परंतु, निवडलेले पर्याय हे मराठी भाषेच्या प्रकृतीशी विरोधी असू नयेत. अडचणीच्या व अपवादात्मक परि-स्थितीत संस्कृत भाषेतील क्रियापदे, उपसर्ग, वगैरेंचा आधार घ्यावा. मात्र, भाषेच्या शुद्धीकरणाचे धोरण ठेवू नये.

६. विवक्षित वैज्ञानिक शब्दांसाठी जे देशीय पर्याय मराठी भाषेत प्रचलित आहेत ते व सर्वसामान्यपणे वापरात असलेले अन्य पर्याय तसेच राहू द्यावेत. जसे :– तार (telegram), बिनतारीयंत्र (telegraph), खंड (continent), अणु (atom), वगैरे.

७. विदेशी भाषांमधील जे शब्द मराठी भाषेत प्रचलित आहेत, ते तसेच ठेवावेत. जसे :– मशीन, इंजिन, लाव्हा, मीटर, लिटर, वगैरे.

८. **आंतरराष्ट्रीय संज्ञांचे देवनागरी लिपीत लिप्यंतरण:–** आंतरराष्ट्रीय स्वरूपाच्या इंग्रजी संज्ञा जशाच्या तशा स्वीकारताना, त्यांचे प्रमाण इंग्रजी उच्चारानुरूप लिप्यंतरण करावे.

९. **लिंगनिर्देश:–** मराठी भाषेत स्वीकारलेल्या आंतरराष्ट्रीय संज्ञांचा लिंगनिर्देश हा, मराठी भाषेच्या प्रकृतीशी विसंगत होणार नाही असा असावा. सर्वसाधारणपणे अशा संज्ञांचा लिंगनिर्देश पुल्लिंगात असावा.

१०. **शास्त्रीय संज्ञांच्या पर्यायांच्या बाबतीत संधी व समास :–** दोन किंवा अधिक पर्यायांचा संधी किंवा समास करताना, गुंतागुंतीचे व क्लिष्ट प्रकार टाळण्यात यावे. नव्याने बनवण्यात आलेल्या शब्दांमध्ये आदिवृद्धी टाळावी.

११. **अनुस्वार:**— अनुनासिक वर्णांच्या जागी अनुस्वाराचा उपयोग करता येईल. परंतु, antenna, tangent सारख्या शब्दांत तो शक्यतोवर वापरू नये. असे शब्द 'अॅन्टेना', 'टॅन्जंट', असे लिप्यंतरित करावेत.

१२. **मिश्र शब्दांची (हायब्रिड वर्ड्स्) निर्मिती:**— वैज्ञानिक व तांत्रिक परिभाषा तयार करताना, 'pasteurisation — पाश्चरीकरण', 'voltage — व्होल्टता', 'ionisation — आयनन' अशांसारखे मिश्र शब्द बनवणे हे भाषेच्या स्वाभाविक प्रवृत्तीस अनुसरून असल्याने गरजेनुसार असे शब्द तयार करावेत.

१३. जरूर तेथे समान अर्थी पारिभाषिक शब्दांची कुळे लक्षात घेऊन त्यांसाठी निश्चितार्थक पर्याय तयार करावे.

* * *

# संक्षेप सूची

| | |
|---|---|
| *abbr.* | abbreviation |
| *Acous.* | Acoustics |
| *adj.* | adjective |
| *adv.* | adverb |
| *Agric.* | Agriculture |
| *Alg.* | Algebra |
| Am. | American, America |
| *Anat.* | Anatomy |
| *Astron.* | Astronomy |
| *Biol.* | Biology |
| Brit. | British |
| *cf.* | compare |
| *Chem.* | Chemistry |
| *Civ. Eng.* | Civil Engineering |
| *constr.* | construction |
| *Crystal.* | Crystallography |
| Dan. | Danish |
| *Diel.* | Dielectrics |
| Du. | Dutch |
| e. g. | for example |
| *Elec.* | Electricity |
| *Elec. Comm.* | Electrical Communication |
| *Elec. Eng.* | Electrical Engineering |
| *Eng.* | Engineering, Engines |
| Eng. | English, England |
| esp. | especially |
| *Fig.* | figuratively |
| Fr. | French |
| *Geog.* | Geography |
| *Geol.* | Geology |
| *Geom.* | Geometry |
| Ger. | German |
| Gk. | Greek |
| *Hyd.* | Hydraulics |
| *Hyd. Eng.* | Hydraulic Engineering |
| *I.C. Eng(s)* | Internal-Combustion Engine(s) |
| i. e. | that is |
| in comb. | in combination or used in combination |
| Ital. | Italian |
| *Mach.* | Machines |
| *Magn.* | Magnetism |
| *Math.* | Mathematics |
| *Mech.* | Mechanics |
| *Med.* | Medical |
| *Met.* | Metallurgy |
| *Meteor.* | Meteorology |
| *Min.* | Mineralogy |
| Mme. | Madame |

## संक्षेप सूची– चालू

| | | | |
|---|---|---|---|
| Mod. | Modified, Modern | Skt. | Sanskrit |
| *n.* | noun | *specif.* | specifically |
| Norw. | Norwegian | *Stat.* | Statistics |
| *Nucl.* | Nuclear | *suff.* | suffix |
| *Nucl. Phys.* | Nuclear Physics | *Surv.* | Surveying |
| *Ocean.* | Oceanography | *syn.* | synonym |
| oft. | often | U. S. | United States |
| orig. | originally | usu. | usually |
| *pfx.* | prefix | *vb.* | verb |
| *Photoelectron.* | Photoelectronics | *v.i.* | verb, intransitive |
| *Photog.* | Photography | *v.t.* | verb, transitive |
| *pl.* | plural | *v.t. & i.* | verb, transitive and intransitive |
| Pol. | Polish | *w. r. t.* | with reference to |
| *prep.* | preposition | अ. क्रि. | अकर्मक क्रियापद |
| *Print.* | Printing | अ. व. | अनेकवचन |
| prob. | probably | इ. | इत्यादि |
| *Radiol.* | Radiology | न. | नपुंसकलिंग |
| ref. | reference | पु. | पुल्लिंग |
| Russ. | Russian | सा. | सामान्य लिंग |
| Scot. | Scottish, Scotland | सं. | संकेतचिन्ह |
| *Seismol.* | Seismology | स्त्री. | स्त्रीलिंग |
| *sing.* | singular | | |



शास्त्रीय परिभाषेत संकेतचिन्हे म्हणून
नेहमी वापरण्यात येणारी

**ग्रीक मुळाक्षरे**

| संकेतचिन्हे | | मराठी | संकेतचिन्हे | | मराठी |
|---|---|---|---|---|---|
| Α | α | आल्फा | Ν | ν | न्यू |
| Β | β | बीटा | Ξ | ξ | क्साय |
| Γ | γ | गॅमा | Ο | ο | ओमायक्रॉन |
| Δ | δ | डेल्टा | Π | π | पाय |
| Ε | ε | एप्सायलॉन | Ρ | ρ | रो |
| Ζ | ζ | झीटा | Σ | σ | सिग्मा |
| Η | η | ईटा | Τ | τ | टाऊ |
| Θ | θ | थीटा | Υ | υ | यूप्सिलॉन |
| Ι | ι | आयोटा | Φ | φ | फाय |
| Κ | k | काप्पा | Χ | χ | खाय |
| Λ | λ | लॅम्ब्डा | Ψ | ψ | साय |
| Μ | μ | म्यू | Ω | ω | ओमेगा |

# A

α (*also* A) (*symbol* for *alpha*) **आल्फा** (सं. α किंवा A)
α-particle α-**कण** (आल्फा कण)
α-rays α-**किरण** (आल्फा किरण)

**a–**, *pfx.* (meaning *not, without, lacking*) **अ–** (as in : astatic अस्थितिक; asynchronous असंकालिक)

**a,** (*also* A) *Elec. Eng.* (commonly used abbreviation for *ampere*) **ॲम्प** (as in : 25A *or* 25a २५ ॲम्प = २५ ॲम्पिअर)

A, १ (as, *symbol* for *alpha*) **आल्फा** (α) २ (*also* a) *Elec. Eng.* (as, *abbr.* of *ampere*) **ॲम्प** ३ (*also* **A. U.**) (as, *abbr.* of *Angstrom unit*) **अे** (अँगस्ट्रॉम एकक)

**ab–**, *pfx.* १ (departing from) **अप–** (as in : abnormal अपसामान्य) २ *Elec. Eng.* (as, *abbr.* of *absolute*— used for a cgs electromagnetic unit) **ॲब–** (निरपेक्ष) (as in : abohm ॲबोम– निरपेक्ष ओम)

**abampere,** *n. Elec. Eng.* (the cgs electromagnetic unit of electric current) **ॲबॅम्पिअर** (पु.)

**A-battery,** *Elec. Comm.* **A-बॅटरी** (ए बॅटरी)

**Abbe condenser,** (after Ernst Abbe, Ger. physicist— an adjustable substage lens used as a condenser for a compound microscope) **ॲबी नाभीयक**

**Abbe number,** **ॲबी अंक**

**Abbe refractometer,** *Chem.* (an instrument for measuring directly the refractive index, as of oils, etc.) **ॲबी अपवर्तनांकमापी**

**Abbe sine condition,** **ॲबी साइन पूर्व आवश्यकता**

**abbreviate,** *v.t.* **संक्षेप करणे**

**abbreviated,** *adj.* **संक्षिप्त**

**abbreviation,** *n.* १ **संक्षेप** (पु.) २ **संक्षेपाक्षर** (न.)

**abbreviatory,** *adj.* **संक्षेपात्मक**

**abcoulomb,** *n. Elec. Eng.* (the cgs electromagnetic unit of charge) **ॲबकूलोम** (पु.)

**Abel equation,** **ॲबेल समीकरण**

**Abelian group,** (after Niels Abel, Norw. mathematician) (as, a commutative group) **ॲबेल गट**

**aberrance = aberrancy,** *n.* (the quality of being aberrant) **विपथनशीलता** (स्त्री.), **विपथचारिता** (स्त्री.)

**aberrant,** *adj.* **विपथी, विपथचारी**

**aberration,** *n. Light, Optics, Astron.* (the act of wandering away or of going astray) **विपथन** (न.) (विपथन– *short* for विपथगमन; वि= away; पथ= course; विपथ=

astray; गमन= going)
*cf.* deflection *or* deflexion विक्षेपण
deviation विचलन
divergence अपसरण
variation १ चलन २ विचरण
**chromatic aberration वर्णीय विपथन**
**longitudinal aberration अनुलंब विपथन**
**optical aberration प्रकाशीय विपथन**
**planetary aberration ग्रहीय विपथन**
**spherical aberration गोलीय विपथन**

**aberrational,** *adj.* (characterised by aberration) **विपथी, विपथनशील, विपथन–**

**aberration error, विपथन त्रुटि**

**aberration of light, प्रकाश विपथन, प्रकाशाचे विपथन**

**aberrations of lenses, भिंगांची विपथने** (न. अ. व.)

**abfarad,** *n. Elec. Eng.* (the cgs electromagnetic unit of capacitance) **ॲबफॅरॅड** (पु.)

**abhenry,** *n. Elec. Eng.* (the cgs electromagnetic unit of inductance) **ॲबहेन्री** (पु.)

**ability,** *n.* १ (capacity to perform) **समर्थता** (स्त्री.) २ (power to perform) **क्षमता** (स्त्री.) ३ (skill or competence in doing) **कार्यकुशलता** (स्त्री.)

**able,** *adj.* **१ समर्थ २ क्षम ३ सक्षम**

**–able,** *suff.* (used in comb.) **–योग्य, –पात्र, –य, –ईय**

**abnormal,** *adj.* १ (deviating from the normal; differing from the typical) **अपसामान्य** (अप– deviating from; सामान्य— normal) **२ असामान्य** (as in : abnormal circumstances असामान्य परिस्थिति)

**abnormal dispersion,** *Light, Optics* **अपसामान्य अपस्करण**

**abnormal glow, अपसामान्य प्रभा**

**abnormality,** *n.* **१ अपसामान्यता** (स्त्री.) **२ असामान्यता** (स्त्री.)

**abnormal reflection, अपसामान्य परावर्तन**

**abohm,** *n. Elec. Eng* (the cgs electromagnetic unit of resistance) **ॲबोम** (पु.)

**abrade,** *v.t.* **अपघर्षण करणे**

**abrasion,** *n.* (wearing, grinding or rubbing away by friction) **अपघर्षण** (न.) *cf.* erosion

**abrasive,** *n.* **घर्षक द्रव्य** (न.)

**abridge,** *v.t.* **संक्षेपणे, संक्षेप करणे**

**abridged,** *adj.* **संक्षिप्त**

**abridged notation,** *Math.* **संक्षिप्त संकेतन**

**abridgment,** *n.* **संक्षेप** (पु.)

**abscissa,** *n.* (*pl.* **abscissas** *or* **abscissae**) *Math.* **भुज** (पु.) *cf.* ordinate

**absolute,** *adj.* १ (determined in itself; not relational; independent of arbitrary standards of measurement; having reference to or derived in the simplest manner from the fundamental units of length, mass and time) **निरपेक्ष** २ (simple; pure; free from mixture; free from imperfection) **केवल** (as in : absolute alcohol *Chem.* केवल अल्कोहोल)

**absolute boiling-point, निरपेक्ष उत्कलनांक**

**absolute coefficient, निरपेक्ष गुणांक**

**absolute constant,** (a constant, as $\pi$, that has the same value wherever it occurs in mathematics) **केवल स्थिरांक**

**absolute density, निरपेक्ष घनता**

**absolute galvanometer,** *Elec. Eng.* **निरपेक्ष गॅल्व्हानोमीटर**

**absolutely,** *adv.* **१ निरपेक्षपणे** २ केवल

**absolute magnitude, १ निरपेक्ष अभिमिति, निरपेक्ष परिमाण** २ *Astron.* **निरपेक्ष प्रत**

